"चंद्रपूर वन विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने)" या अकादमीकरिता सन २०१६-१७ मध्ये सहायक अनुदाने (योजनांतर्गत) वितरीत करणे.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०१६/प्र.क्र.११९/फ-२**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक :- १५ मार्च, २०१७**

**वाचा** :- १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अंर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.०४.२०१६.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२६(१६-१७)/९७, दि.२१.०४.२०१६.
३) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.एफडीएम-२०१६/प्र.क्र.११९/फ-२, दि.२७.०४.२०१७
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२६(१६-१७)/२२७२, दि.०६.०३.२०१७.

**प्रस्तावना :-**

सन २०१६-१७ करिता "वन अकादमी चंद्रपूर (४४१५ ०१८१)" या लेखाशीर्षाअंतर्गत एकूण रु.५००.०० लक्ष इतका निधी मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आलेला असून सदर अर्थसंकल्पीत निधीच्या अनुषंगाने संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये रु.३४०.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आलेला आहे. आता, अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.४ येथील दि.०६.०३.२०१७ रोजीच्या पत्रान्वये ४४१५०१८१ या संकेतांकाअंतर्गत रु.७४.०० लक्ष रक्कमेचा सहायक अनुदाने वितरणाचा प्रस्ताव शासनास सादर केला असून सदर निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

२. वित्त विभागाच्या दि.२०.०४.२०१६ रोजीच्या परिपत्रकान्वये, सन २०१६-१७ करिता भांडवली खर्च योजनांतर्गत / योजनेत्तर योजनांकरिता १०० % मर्यादेत निधी वितरित करण्याकरिता मान्यता देण्यात आलेली आहे. त्याअनुषंगाने, संदर्भ क्र.४ येथील दि.०६.०३.२०१७ रोजीच्या पत्रान्वये रु.७४.०० लक्ष इतक्या रक्कमेचा प्रस्ताव प्राप्त झालेला आहे. सदर प्रस्तावातील इमारत दुरुस्ती साहित्य याकरिता दर्शविलेली रु.४०.०० लक्ष इतकी रक्कम वगळून उर्वरीत **रु.३४.०० लक्ष (३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) )** इतका निधी वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वरील निधी खर्च करताना खालील अटी व शर्ती यांची पूर्तता होईल याची दक्षता घ्यावी :-

I) संस्थेने आर्थिक वर्ष २०१६-१७ मध्ये मंजूर व वितरित अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.

II) सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर ती काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे. तसेच वित्त विभागाच्या दि.२०.०४.२०१६ रोजीच्या परिपत्रकातील अटींची पूर्तता होईल याची दक्षता घ्यावी.

III) संस्थेने मागील वर्षाकरिता त्यांना उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

IV) चंद्रपूर वन विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी, चंद्रपूर या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

४. उपरोक्त खर्च मागणी क्रमांक सी-१०, प्रधानशीर्ष - ४४१५, कृषि विषयक संशोधन व शिक्षण यावरील भांडवली खर्च, २७७- शिक्षण, (००) (०६) वनीकरण अकादमी चंद्रपूर (४४१५०१८१) या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ करिता उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दि.२०.०४.२०१६ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ मधील भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१५१७३०४०७९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.03.15 17:32:18 +05'30'

(डी.एल.थोरात)
सह सचिव
महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) / (कार्मिक), म.रा.नागपूर.

४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), कोल्हापूर.

५) मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.

६) संचालक, चंद्रपूर वन विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी, चंद्रपूर.

७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर

८) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.

९) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.

१०) जिल्हा कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, चंद्रपूर

११) फ-९/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२) निवडनस्ती, फ-२ कार्यासन,महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.